दगडपारवा ल.पा. प्रकल्प, बार्शिटाकळी ग्रामीण पाणी पुरवठा योजना, ता. बार्शिटाकळी, जि. अकोला पाणी आरक्षणाबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक लपाप्र २२१५/(१६६ /१५)/लपा-२
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ३१ ऑक्टोबर, २०१५

संदर्भ :-

१) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०१३/ (४१५/२०१३/ ) सिंव्य(धोरण), दिनांक:- १६ ऑगस्ट, २०१४.

२) महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ यात सुधारणा करण्याकरिता अधिनियम, दि.२२ एप्रिल,२०११.

प्रस्तावना :-

१. शासनाच्या पूर्वीच्या धोरणानुसार, पिण्याच्या पाण्यासहित सर्व प्रकारच्या बिगरसिंचन प्रयोजनासाठी उदा. उद्योग, औष्णिक विद्युत प्रकल्प, अन्य सिंचनेतर संस्था इ., यांना पाणीआरक्षण द्यावयाचे जे प्रस्ताव जलसंपदा विभागाकडे प्राप्त होतात, त्यातील पाण्याचे आरक्षण हे जलसंपदा विभागाच्या प्रकल्पांच्या जलाशयातील उपलब्ध पाणीसाठयाच्या १५ टक्क्यांपेक्षा कमी असल्यास, त्यास संबंधित मुख्य अभियंता तसेच हे प्रमाण १५ टक्के ते २५ टक्के असे असल्यास, त्यास मंत्रालयीन आंतर विभागीय सचिवस्तरीय समितीकडून मान्यता देण्यात येत होती. त्याचप्रमाणे हे प्रमाण २५ टक्क्यांपेक्षा जास्त असल्यास, त्यास मा. मंत्रीमंडळाची उपसमिती असलेल्या, मा. मंत्री, जलसंपदा यांच्या अध्यक्षतेखालील मा. मंत्री उच्चाधिकार समितीकडून मान्यता देण्यात येत होती.

२. महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण (सुधारणा व पुढे चालू ठेवणे) अधिनियम, २०११ यातील कलम ५ मधील १६(क) नुसार जलसंपत्ती प्रकल्पांमधील पाण्याचे क्षेत्रीय वाटप राज्य मंत्रीमंडळाकडून केले जाईल अशी तरतूद करण्यात आली आहे. परंतु दि. २०.८.२०१४ रोजी मा.मंत्रीमंडळ बैठकीत असा निर्णय घेण्यात आला आहे की, जलसंपदा विभागाच्या प्रकल्पातून जिल्हापरिषदा ,नगरपरिषदा , नगरपालिका ,नगरपंचायती ,ग्रामपंचायत, आणि कटक मंडळे (Cantonment Board) यांनी पिण्यासाठी पाणी मागणी केलेल्या नळ पाणी पुरवठा योजनांबाबतचे बिगर सिंचन पाणी आरक्षण प्रस्ताव मा. मंत्री मंडळासमोर मान्यतेस्तव सादर करण्याऐवजी त्यास मा. मंत्री, जलसंपदा विभाग यांच्या स्तरावरूनच मान्यता देण्यात यावी तथापि, महानगरपालीका, विशेष नगर विकास प्रकल्प (Special Township Project) व औद्योगिक प्रयोजनासाठी बिगर सिंचन पाणी आरक्षणाच्या प्रस्तावांना मा. मंत्रीमंडळाची मान्यता आवश्यक राहिल.

शासन निर्णय -:

३. खालील तक्त्यातील रकाना क्र.२ मध्ये नमुद संस्थांना त्यांचे नावासमोर रकाना क्र.५ मध्ये नमूद पाणी आरक्षणास, परिच्छेद ४ मधील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पाणी आरक्षणाची मागणी करणाऱ्या संस्थेचे नांव | पाणी आरक्षण प्रकार ( घरगुती) | जलाशय/ कालवा/ नदीचे नांव | मंजूर केलेले पाणी आरक्षण (दलघमी) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | बार्शिटाळकी,ता. बार्शिटाळकी ,जि.अकोला पाणी पुरवठा योजना | पेयजल | दगडपारवा ल.पा. प्रकल्प, ता. बार्शिटाळकी जि. अकोला | ०.९०३ |
| २ | शिवर व ६ गावे, ता.जि.अकोला प्रादेशिक पाणी पुरवठा योजना | पेयजल | दगडपारवा ल.पा. प्रकल्प, ता. बार्शिटाळकी जि. अकोला | ०.९१६ |

४. उपरोक्त नमूद प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात आली आहे.

१) संस्थेने पाणी मोजमाप करण्याचे दृष्टीने जलमापन यंत्र (Water Meter) बसविणे आवश्यक आहे. घरगुती पाणी वापराकरीता शासनाच्या प्रचलित दराने आगाऊ पाणीपट्टी वसूल करावी.

२) संस्थेने आपत्कालीन परिस्थितीत स्वत:ची पर्यायी व्यवस्था करावी. उक्त ठिकाणी पाण्याअभावी किंवा आपत्कालीन परिस्थितीत संस्थेस पाण्याची गरज भागविण्यासाठी ६० दिवस पाणी पुरेल इतक्या क्षमतेचा साठवण तलाव स्वखर्चाने बांधावा. तसेच या कालावधीत पाणी उपलब्ध नसल्यास जलसंपदा विभागाची कोणतीही जबाबदारी राहणार नाही.

३) बहुतेक पाणी पुरवठा योजना सुरु करण्यास आरंभ काळ ( Gestation Period ) लागतो. सर्वसाधारणपणे या कालावधीत संस्था करारनामा करण्यास टाळते अथवा संस्थेसोबत बिगरसिंचन करारनामा केला असला तरीही शासनास कोणतीही पाणीपट्टी प्राप्त होत नाही. तथापि संस्थेने पाणी आरक्षण केलेले असल्यामुळे त्यांच्याकडून पाणीवापर होत नसूनही ते इतर अर्जदारांना सुद्धा देणे शक्य होत नाही. यामुळे शासनास मोठ्या महसुलास मुकावे लागते, ही बाब विचारात घेता, अशा पाणी आरक्षण प्रस्तवास मान्यता देतांना, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई यांनी महाराष्ट्र राज्यासाठी ठोक पाणी प्रशुल्क निकष, भाग ३ मधील परिच्छेद १३.४ (पाच) मध्ये नमूद केल्यानुसार कार्यवाही करण्यात येईल.

जलसंपदा विभागाशी करारनामा करतांना बिगर सिंचन पाणी वापरकर्ते अंतिम पाणी मागणी प्रमाणे टप्प्याटप्प्याने पाणी वापर करण्याचे नियोजन नमूद करु शकतील. अंतिम पाणी मागणी प्रमाणे पुरवठा सुरु होईपर्यंत वर्षनिहाय खालीलप्रमाणे आकारणी करण्यात येईल.

अ) टप्प्यानुसार ठरवून घेतलेल्या प्रमाणात पाणीवापर असल्यास लागू दराने आकारणी.

ब) टप्प्यानुसार ठरवून घेतलेल्या पाणीवापरापेक्षा ± १०% पाणी वापर(अधिक/कमी) झाल्यास, फरकाच्या वापरास दंडणीय दर लागू दराच्या १.५ पट.

क) उर्वरित प्रमाणाकरिता म्हणजे अंतिम नियोजित पाणी वापर वजा टप्प्यानुसार नियोजित पाणी वापराकरिता, बांधिलकी/लेखबध्द आकार लागू दराच्या ५ टक्के वार्षिक दराने आकारण्यात येईल.

४) जलस्त्रोत प्रदुषित करणाऱ्या पाणी वापरकर्त्याकडून दंडनीय पाणीपट्टी आकारणी करणेबाबत मार्गदर्शक तत्वे या विषयाबाबत शासन निर्णय क्र. पापव-२०१३/(प्र.क्र.४६६/२०१३)/सिंव्य (महसूल) दि. १२/११/२०१३ मधील अटींचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहील.

५) सांडपाण्यामुळे जलस्त्रोताचे अथवा नद्यांचे प्रदुषण होणार नाही याची संबंधित संस्थानी दक्षता घ्यावी.

६) संस्थेस प्रथम पाणी वापर करण्यास परवानगीचे इरादापत्र (लेटर ऑफ इंटेन्ट) देण्यात यावे व करारनामा करण्याकरीता ३ महिन्यांची मुदत ठेवावी. करारनामा झाल्यानंतरच प्रत्यक्ष पाणी परवाना दिल्याचे ग्राह्य मानण्यात येईल. संस्थेने सदर करारनामा विहित मुदतीत (३ महिन्यांच्या आत) न केल्यास संस्थेचे पाणी आरक्षण आपोआप रद्द होईल.

५. सदर आरक्षणाच्या अनुषंगाने आवश्यक माहिती ई-जलसेवाच्या संबंधित मॉडयुल मध्ये भरण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१५१०३०१७००४५७४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2015.10.31 14:47:10 +05'30'

**(रा. बा. क्षिरसागर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.

१० मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सर्व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. सर्व कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ , नागपूर.
१९. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर
२०. अधीक्षक अभियंता, वाशिम पाटबंधारे मंडळ , वाशिम.
२१. निवडनस्ती कार्यासन लपा-२.